**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांकः उसप-१३१४/प्र.क्र.९५/का.१४**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ०१.११.२०१४

## आदेश

श्रीमती प्र.प्र.चिटणीस, सह सचिव, नियोजन विभाग यांची प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, पुणे या पदावर प्रथमत: दोन वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्रीमती चिटणीस ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर दोन वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करून त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रूजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्रीमती प्र.प्र.चिटणीस, यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन नियोजन विभाग तसेच सामान्य प्रशासन विभाग/का.११ अ, यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्रीमती चिटणीस यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी नियोजन विभाग तसेच सा.प्र.वि./का.११ अ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील. श्रीमती चिटणीस यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी नियोजन विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११०११६०८०४०४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2014.11.01 16:20:47 +05'30'

**(स.का.जोंधळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३. प्र.स. (सेवा) सा.प्र.वि,
४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
५. उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग
६. सा.प्र.वि./का.११-अ
७. श्रीमती प्र.प्र.चिटणीस, स.स., नि.वि.
८. निवड नस्ती/का.१४.